# ६.शिपयार्ड आणि जहाज पुनर्वापर सुविधा यांच्या विकासासाठी नियोजन

जहाजबांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर उद्योगात कार्यक्षमता आणि समन्वय वाढवण्यासाठी, तसेच विद्यमान आणि भविष्यातील पायाभूत सुविधांचा फायदा घेण्यासाठी, राज्यातील या क्षेत्रातील वाढ आणि प्रगतीला चालना देण्यासाठी एक व्यापक विकास धोरण आवश्यक आहे. हे धोरण खालील स्तंभांवर आधारित असेल:

| | | |
|---|---|---|
| १ विकास मॉडेल | २ जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापरासाठी प्रोत्साहन | ३ सर्व आवश्यक परवानग्या / मंजुरी मिळविण्यासाठी नियामक प्राधिकरणांशी समन्वय साधणे |
| ४ सक्षम पायाभूत सुविधांची तरतूद- जोडणी(रेल्वे/ रस्ते), सुविधा (पाणी, वीज इ.) | ५ कौशल्य विकासाला चालना | ६ संशोधन आणि विकासाला चालना |

# ७.विकास मॉडेल

महाराष्ट्राच्या किनारपट्टीवरील शिपयार्डचा विकास खालील विकास मॉडेलवर आधारित असेल-

| | | |
|---|---|---|
| 1 सागरी शिपयार्ड समूह (Marine Shipyard Cluster) | 2 विद्यमान किंवा नव्याने येणा-या आगामी बंदरांमध्ये शिपयार्ड आणि जहाज पुनर्वापर सुविधांची निर्मिती | 3 एकल शिपयार्ड आणि जहाज पुनर्वापर सुविधांचा विकास (Stand-Alone Shipyards and Ship Recycling Yards) |

## ७.१. सागरी शिपयार्ड समूह (Marine Shipyard Cluster)

सागरी शिपयार्ड समूहात क्लस्टर-आधारित दृष्टिकोनातून जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर युनिट्स, अनुषंगिक उद्योग, कौशल्य सुविधा, शिपयार्ड पूरक सुविधा आणि सामाजिक पायाभूत सुविधा सक्षम करणे समाविष्ट आहे. यामुळे लॉजिस्टिक्स खर्च कमी होईल, कच्चा माल, उपकरणे आणि घटक सहज उपलब्ध होतील, सर्व संबंधित कौशल्यांमध्ये प्रशिक्षित मनुष्यबळाची उपलब्धता, संशोधन सुविधा आणि सामायिक पायाभूत सुविधा उपलब्ध होतील. क्लस्टर-आधारित दृष्टिकोन उद्योगासाठी खर्च कमी करतो आणि प्रकल्प अंमलबजावणी चक्र कमी करतो.

### ७.१.१ सागरी शिपयार्ड समूहाचे (MSC) घटक

१. **शिपयार्ड:** आधुनिक शिपयार्ड वेगवेगळ्या आकाराची जहाजे तयार करू शकतात आणि / किंवा दुरुस्ती करु शकतात- प्रवासी, ऑफशोअर पुरवठा जहाजे, किनारी जहाजांपासून ते मोठ्या समुद्रात जाणारी जहाजे. शिपयार्डकडे आवश्यक पायाभूत सुविधा असतील जसे की:

**सागरी बाजूच्या पायाभूत सुविधा**

सुकी गोदी (Dry Dock), स्लीपवे, शिप लिफ्ट, तरंगती सुकी गोदी (Floating Dry Dock)

**जमिनीकडील बाजूच्या पायाभूत सुविधा**

फॅब्रिकेशन कार्यशाळा, गोदामे, ब्लास्टिंग आणि पेंटिंग चेंबर्स, पाईप फॅब्रिकेशन कार्यशाळा, एकात्मता सुविधा, फिनिशिंग विभाग

**इतर पायाभूत सुविधा**

उपकरणे, क्रेन्स, नियोजन आणि उत्पादन नियंत्रण कार्यालये, डिझायनिंग क्षेत्र आणि इतर कोणत्याही आवश्यक सुविधा

२. **जहाज पुनर्वापर सुविधा**

३. **पूरक उद्योग** (Ancillary Industries) : जहाज बांधणी, जहाज दुरुस्तीसह दुरुस्ती कार्यशाळा आणि शिपयार्डशी संबंधित सेवा पुरवठादारांसाठी आवश्यक घटकांचा पुरवठा करणारे उद्योग क्लस्टरमध्ये स्थापन करण्यास प्रोत्साहित केले जातील. पूरक उद्योगांमध्ये पुढील बाबी समाविष्ट केल्या जातील -

- नौकानयन उपकरणे: होकायंत्र, जीपीएस, रडार, सोनार आणि नकाशे
- दळणवळण उपकरणे: रेडिओ, उपग्रह फोन आणि टेलिग्राफ
- प्रणोदन आणि स्टीअरिंग उपकरणे: इंजिन, प्रोपेलर आणि रुडर
- सुरक्षा उपकरणे : लाईफ राफ्ट आणि जॅकेट, अग्निशामक यंत्रे आणि धूर शोधक (smoke detector)
- डेक मशीनरी: क्रेन, विंच आणि अँकर विंडलासेस
- विद्युत उपकरणे: जनरेटर, ट्रान्सफॉर्मर, स्विचबोर्ड आणि बॅटरी
- इलेक्ट्रॉनिक प्रणाली
- पर्यावरण नियंत्रण उपकरणे: वातानुकूलन, रेफ्रिजरेशन आणि सांडपाणी प्रक्रिया
- अग्निशामक उपकरणे: अलार्म, पंप आणि नळी
- लोडिंग आणि अनलोडिंग उपकरणे: डेरिक्स आणि कार्गो गिअर
- वैद्यकीय उपकरणे: प्रथमोपचार किट, डिफिब्रिलेटर आणि ऑक्सिजन टाक्या
- जहाजाच्या कार्यचालनासाठी प्रणाली किंवा उपकरणे, निवास, वीज निर्मिती, इंजिन ऑपरेशनसाठी सहाय्यक प्रणाली (auxiliary systems) आणि उपकरणे
- जहाज दुरुस्ती आणि देखभाल सेवा प्रदाता
- दुरुस्ती सेवा (Overhauling services)
- इतर कोणत्याही आवश्यक सुविधा

४. **कौशल्य सुविधा:** सर्व संबंधित कौशल्य आवश्यकतांसाठी कौशल्य विकास केंद्रे. ही केंद्रे वाटप केलेल्या भूखंडांमध्ये महाराष्ट्र सागरी मंडळ किंवा इतर सरकारी संस्थांद्वारे किंवा खाजगी इच्छुक संस्थांद्वारे स्थापित केली जाऊ शकतात.

५. **शिपयार्ड सहाय्यकारी सुविधा:** अभियांत्रिकी आणि संशोधन आणि विकास केंद्रे, चाचणी सुविधा, स्टार्टअप इन्क्युबेशन सेंटर आणि एकात्मिक लॉजिस्टिक्स हब

६. **सामाजिक पायाभूत सुविधा :** कामगार आणि त्यांच्या कुटुंबियांना आधार देण्यासाठी गृहनिर्माण, आरोग्यसेवा, शिक्षण आणि इतर आवश्यक सामाजिक पायाभूत सुविधा क्लस्टरमध्ये समाविष्ट केल्या जातील. त्यासाठी जागा राखीव ठेवण्यात येईल व त्याचे वाटप करण्यात येईल.

## ७.१.२ स्थान धोरण

देशांतर्गत आणि आंतरराष्ट्रीय बाजारपेठांना सहज प्रवेश मिळावा यासाठी हे क्लस्टर प्रमुख बंदरांपासून किंवा किनारपट्टीवरील मोक्याच्या ठिकाणांपासून ३० कि.मी. पर्यंतच्या परिघात असतील. महाराष्ट्र सागरी मंडळ अशा सुयोग्य ठिकाणांचा शोध घेईल. सागरी शिपयार्ड समूहांच्या विकासासाठी सध्या निश्चित केलेली संभाव्य ठिकाणे खालीलप्रमाणे आहेत.

| प्रस्तावित MSC स्थान | खाडी / नदी | भराव करावयाची ITZ जमीन (एकर) | संपादित करण्यात येणारी जमीन (एकर) | एकूण विकासयोग्य जमीन (एकर) | वॉटरफ्रंट (मी) | भरतीच्या श्रेणीसह उपलब्ध खोली | ड्रेजिंगसह प्रस्तावित खोली |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **दिघी** | राजापुरी खाडी | १८०० | ७५० | २५५० | ३००० | ९ मी | १४ मी. |
| **जयगड** | जयगड खाडी | ६६० | ६७७ | १३३७ | १६०० | ९ मी | १४ मी. |
| **दाभोळ** | वाशिष्ठी नदी | १३१ | ८०० | ९३१ | १००० | ८.५ मी. | १४ मी. |
| **नांदगाव** | खुला समुद्र | २२५ | २४४४ | २६६९ | १००० | ६.० मीटर (किनाऱ्यापासून १.० किमी अंतरावर) | १४ मी. |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **विजयदुर्ग** | खुला समुद्र | ३५९ | १०१२ | १३७१ | १००० | ८.५ मी. (किनाऱ्यापासून ०.५ कि.मी. अंतरावर) | १४ मी. |
| **बाणकोट** | सावित्री नदी | ३७० | ४८६ | ८५६ | ५०० | ११ मी. | १४ मी. |

तपशील **परिशिष्ट-१** मध्ये दिला आहे

### ७.१.३ विकास यंत्रणा (Development Mechanism)

- भूसंपादन आणि जमिनीच्या विकासासह MSC च्या डिझाइन आणि विकासाची जबाबदारी महाराष्ट्र सागरी मंडळाची असेल.
- महाराष्ट्र सागरी मंडळ MSC साठी लेआउट प्लॅन तयार करेल आणि विकासासाठी व्यापक चौकट प्रदान करेल.
- महाराष्ट्र सागरी मंडळ अभ्यास / सर्वेक्षण करेल, परवानग्या घेईल, सामायिक पायाभूत सुविधा आणि सोयी विकसित करेल, जोडणी पायाभूत सुविधा प्रदान करेल आणि ड्रेजिंगसह पाणी आणि वीज पुरवठा सुनिश्चित करेल.
- महाराष्ट्र सागरी मंडळ प्लग अँड प्ले मॉडेलमध्ये विकासासाठी जमीन आणि परवानग्या प्रदान करेल.
- MSC मधील शिपयार्ड, जहाज पुनर्वापर सुविधा आणि पूरक उद्योगांच्या विकासासाठी पारदर्शक निविदा प्रक्रियेद्वारे जमीन दिली जाईल. सदरची निविदा प्रक्रिया ही महसूल वाटणी किंवा आगाऊ प्रीमियम भरणे किंवा महाराष्ट्र सागरी मंडळ ठरवेल अशा इतर कोणत्याही पॅरामीटरवर आधारित असेल. महाराष्ट्र सागरी मंडळ सरकारी एजन्सी किंवा सार्वजनिक क्षेत्रातील युनिट्सना नामनिर्देशन तत्त्वावर शिपयार्ड देखील देऊ शकते.

## ७.२. विद्यमान किंवा नव्याने येणा-या आगामी बंदरांमध्ये शिपयार्ड आणि जहाज पुनर्वापर सुविधा

विद्यमान किंवा नव्याने येणा-या आगामी बंदरांची कार्यक्षमता वाढण्यास मदत व्हावी तसेच अस्तित्त्वातील पायाभूत सुविधांचा पुरेपूर वापर व्हावा याकरिता अशा बंदरांना शिपयार्ड आणि जहाज पुनर्वापर सुविधा निर्माण करण्यासाठी

प्रोत्साहन देण्यात येईल. विद्यमान किंवा नव्याने येणाऱ्या आगामी बंदरांमध्ये स्वतंत्रपणे किंवा जहाज बांधणी कंपन्यांशी भागीदारीत जहाजबांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा विकसित करण्याची लवचिकता असेल.

### ७.२.१ स्थान धोरण

महाराष्ट्रातील विद्यमान किंवा नव्याने येणाऱ्या आगामी बंदरांना जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा विकसित करण्यासाठी प्रोत्साहित करेल.

### ७.२.२ विकास यंत्रणा (Development Mechanism)

- विद्यमान किंवा नव्याने येणा-या आगामी बंदरांचे विकासक किंवा ऑपरेटर हे महाराष्ट्र सागरी मंडळाच्या पूर्वपरवानगीने त्यांना देण्यात आलेल्या क्षेत्रात जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा विकसित करतील.
- विकासक किंवा ऑपरेटरला महाराष्ट्र सागरी मंडळाकडे सविस्तर प्रकल्प अहवाल (डीपीआर) सादर करावा लागेल. महाराष्ट्र सागरी मंडळाने डीपीआरला मंजूरी दिल्यानंतर, विकासक किंवा ऑपरेटरला निर्धारित कालावधीत जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि / किंवा जहाज पुनर्वापर सुविधा विकसित करावे लागेल.

## ७.३. एकल जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा विकास (Standalone Shipyard and Ship Recycling Yard Development)

महाराष्ट्राच्या किनारपट्टीवर सुयोग्य ठिकाणी जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि आणि जहाज पुनर्वापर सुविधांच्या स्थापनेस प्रोत्साहन देईल.

### ७.३.१ स्थान धोरण

महाराष्ट्र सागरी मंडळ शिपयार्ड आणि जहाज पुनर्वापर सुविधासाठी योग्य ठिकाणांचा शोध घेईल. खाजगी विकासक किंवा प्रकल्प प्रवर्तक देखील योग्य ठिकाणे सुचवू शकतात आणि एमएमबीकडे तांत्रिक-आर्थिक सुसाध्यता अहवाल (Techno-Economic Feasibility Study Report) सादर करू शकतात. एकल जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि

जहाज पुनर्वापर सुविधांसाठी किनारपट्टी आणि खाडीकिनारी विकासासाठी सध्या निश्चित केलेली संभाव्य ठिकाणे खालीलप्रमाणे आहेत:-

| प्रस्तावित जागा | खाडी / नदी | भराव करावयाची ITZ जमीन (एकर) | संपादित करण्यात येणारी जमीन (एकर) | एकूण विकासयोग्य जमीन (एकर) | वॉटरफ्रंट (मी) | भरतीच्या श्रेणीसह उपलब्ध खोली |
|---|---|---|---|---|---|---|
| वैतरणा येथे रेल्वे पुलाच्या पूर्व व पश्चिमेला | वैतरणा नदी | ४२ | १८ | ६० | २५० | ६ मी |
| मरंबळ पाडा जेट्टी, विरारच्या पूर्व व पश्चिमेला | वैतरणा नदी | ४० | १९ | ५९ | १००० | ६ मी |
| रेती बंदर, विरार | वैतरणा नदी | ५.५ | ३०.५ | ३६ | १०० | ६ मी |
| भोनांग गाव | कुंडलिका नदी | ७७ | ८० | १५७ | २०० | ५ मी. |
| साळाव बंदराजवळील रेवदंडा | कुंडलिका नदी | ३६ | - | ३६ | ७०० | ६ मी |
| मानकुळे गाव | अंबा नदी | ३ | २५ | २८ | ३५ | ७ मी. |
| शहाबाज | अंबा नदी | १ | १२ | १३ | १८० | ६ मी |
| आडी-ठाकूर आगरदांडा | राजपुरी खाडी | २५ | ५५ | ८० | ७७० | ४.५ मी. |
| रोहिले गाव, जयगड | जयगड नदी | ६.५ | १५.५ | २२ | २०० | ८ मी |
| काताळे गाव, जयगड | जयगड नदी | ४ | - | ४ | १०० | ८ मी |
| विजयदुर्ग जेट्टी | वाघोटन नदी | ४.५ | १६.५ | २१ | ५०० | ६ मी |

तपशील **परिशिष्ट-२** मध्ये दिला आहे.

## ७.३.२ विकास यंत्रणा (Development Mechanism)

- महाराष्ट्र सागरी मंडळ पारदर्शक निविदा पध्दतीने खाजगी विकासकांना जमीन आणि वॉटरफ्रंट देईल.

- एखाद्या विकासकाने प्रकल्पासाठी ठिकाण शोधून त्याचा तांत्रिक-आर्थिक सुसाध्यता अहवालासह प्रस्ताव सादर केला असेल तर, महाराष्ट्र सागरी मंडळ स्विस चॅलेंज किंवा पारदर्शक निविदा पध्दतीने जमीन आणि वॉटरफ्रंट देण्याबाबत निर्णय घेईल.

- खासगी विकासकाची निवड झाल्यानंतर, संबंधित विकासकाला एमएमबी कडे सविस्तर प्रकल्प अहवाल (डीपीआर) सादर करावा लागेल. एमएमबीने डीपीआरला मंजूरी दिल्यानंतर, विकासकाला निर्धारित मुदतीत जहाज बांधणी आणि/किंवा जहाजदुरुस्ती आणि/किंवा जहाज पुनर्वापर सुविधा विकसित करावी लागेल.

- सरकारी एजन्सी किंवा सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम यांना एमएमबी नामनिर्देशन तत्त्वावर देखील जहाज बांधणी, जहाजदुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर साठी मंजूरी देऊ शकते.

# ८. जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापरासाठी प्रोत्साहन

| अ.क्र. | शीर्षक | तपशील |
|---|---|---|
| **जहाज बांधणी, जहाजदुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर विकासासाठी प्रोत्साहन** | | |
| एक. | भांडवली अनुदान | • प्रकल्प किंमतीच्या १५% भांडवली अनुदान<br>• विकासकाने बँक हमी सादर केल्यानंतर, बांधकाम कालावधी दरम्यान ४ समान हप्त्यांमध्ये (मंजूर डीपीआर प्रमाणे प्रकल्पाचे प्रत्येक २५% काम पूर्ण झाल्यानंतर) भांडवली अनुदान दिले जाईल.<br>• चौथा आणि शेवटचा हप्ता हा प्रकल्पाचे व्यावसायिक कार्यचालन सुरु झाल्यानंतर प्रदान करण्यात येईल. |

| अ.क्र. | शीर्षक | तपशील |
|---|---|---|
| **कौशल्य विकासासाठी प्रोत्साहन** | | |
| एक. | कौशल्य विकासासाठी प्रोत्साहन | • जहाज बांधणी किंवा जहाजदुरुस्ती किंवा जहाज पुनर्वापर सुविधांचे विकासकांना किंवा इतर कोणत्याही खाजगी इच्छुक संस्था यांना कौशल्य सुविधा उभारण्यासाठी प्रकल्प खर्चाच्या ६०% किंवा रु. ५ कोटी यापैकी जे कमी असेल, इतके भांडवली सहाय्य देण्यात येईल.<br>• जहाज बांधणी किंवा जहाजदुरुस्ती किंवा जहाज पुनर्वापर सुविधा यांच्याव्दारे कर्मचा-यांच्या कौशल्य विकास किंवा कौशल्यवाढ किंवा कौशल्याची उजळणी करणे यावर खर्च केलेल्या रकमेवर ५०% किंवा १ कोटी रुपये, यापैकी जे कमी असेल इतके वार्षिक सहाय्य देण्यात येईल. |
| **जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर संशोधन आणि विकास सुविधांसाठी प्रोत्साहन** | | |
| एक. | जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर संशोधन आणि विकास सुविधांसाठी प्रोत्साहन | जहाज बांधणी किंवा जहाजदुरुस्ती किंवा जहाज पुनर्वापर सुविधा विकासक किंवा इतर कोणत्याही खाजगी इच्छुक संस्था यांना जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर यामधील संशोधन आणि विकास सुविधा स्थापित करण्यासाठी सुविधा खर्चाच्या ६०% किंवा ५ कोटी रुपये, यापैकी जे कमी असेल तितके भांडवली अर्थसहाय्य देण्यात येईल. |

**टीप:** प्रस्तुतच्या धोरणातील प्रोत्साहनांचा लाभ घेण्यासाठी त्याबाबतची सविस्तर कार्यपध्दती विषद करणारी मार्गदर्शक तत्त्वे स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. महाराष्ट्र सरकारच्या इतर कोणत्याही विद्यमान धोरणांनुसार किंवा मार्गदर्शक तत्त्वांनुसार इतर कोणतेही प्रोत्साहन जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधांसाठी लागू होणार नाही.

# ९.मंजूरी आणि परवानग्या सुलभ करणे

जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा विकासकांना सर्व आवश्यक मंजूरी आणि परवाने प्राप्त करण्याकरिता सहाय्य करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ विविध नियामक प्राधिकरणे आणि मंजूरी एजन्सींशी समन्वय साधेल.

# १०. सक्षम पायाभूत सुविधांची तरतूद

प्रकल्पस्थळापर्यंत आवश्यक त्या सर्व पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी राज्य सरकार प्रयत्नशील राहील-

- जोडणी - जवळच्या जिल्हा मार्ग किंवा राज्य महामार्ग किंवा राष्ट्रीय महामार्गाशी रस्ता जोडणी आणि जवळच्या रेल्वे मार्गाशी रेल्वे जोडणी. रेल्वे जोडणी संदर्भात राज्य सरकार केंद्र सरकारकडे पाठपुरावा करेल.
- सुविधा - पाणीपुरवठा, वीज आणि इतर आवश्यक सुविधा.

# ११. कौशल्य विकासाला चालना

जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापरासाठी नौदल स्थापत्य, जहाज डिझाइन, सागरी, यांत्रिकी आणि विद्युत अभियांत्रिकी, उत्पादन व्यवस्थापन आणि माहिती तंत्रज्ञान अशा विविध शाखांमध्ये कुशल मनुष्यबळाची आवश्यकता असते. पदवीधारक, पदविकाधारक आणि तंत्रज्ञ अशा तीन स्तरांत मनुष्यबळाची आवश्यकता असते. सध्या जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर उपक्रमांमध्ये झालेली वाढ आणि भविष्यातील वाढीचा दृष्टीकोन पाहता, अशा कुशल मनुष्यबळाची कमतरता आहे.

हे धोरण औद्योगिक प्रशिक्षण संस्था (आयटीआय), पॉलिटेक्निक, अभियांत्रिकी महाविद्यालये, सागरी विद्यापीठे आणि इतर नामांकित राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय संस्थांशी करार करून कौशल्य विकास केंद्रांची स्थापना आणि विद्यमान कौशल्य संस्थांना बळकट करण्यास प्रोत्साहन देईल.

ओळखले गेलेले काही प्रमुख व्यवसाय खालीलप्रमाणे आहेत:

- वेल्डर (आर्क, एमआयजी, टीआयजी, बुडालेले आर्क),
- स्ट्रक्चरल फिटर
- प्लेट आणि पाईप फॅब्रिकेटर्स
- पाईप फिटर्स
- शीट मेटल कामगार
- सुतारकाम आणि अंतर्गत सजावट कामगार
- गुणवत्ता नियंत्रण निरीक्षक
- अग्निशमन आणि सुरक्षा तंत्रज्ञ
- इन्स्ट्रुमेंटेशन तंत्रज्ञ
- सागरी चित्रकार
- सागरी यांत्रिकी
- इंजिन फिटर
- प्रणोदन प्रणाली तंत्रज्ञ
- हायड्रोलिक आणि वायवीय तंत्रज्ञ
- इलेक्ट्रिशियन आणि केबल जॉइंटर
- सँडब्लास्टर्स/ग्रिट ब्लास्टर्स
- सागरी इन्सुलेटर (थर्मल आणि ध्वनिक)
- क्रेन ऑपरेटर
- सागरी प्लंबर आणि
- एचव्हीएसी तंत्रज्ञ

**उद्योगाशी सहकार्य:** जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा क्षेत्रातील कंपन्यांना शैक्षणिक संस्थांच्या मदतीने प्रत्यक्ष आणि ऑन-द-जॉब प्रशिक्षण देणारे इंटर्नशीप आणि ॲप्रेंटिसशिप कार्यक्रम राबविण्याकरिता प्रोत्साहन देण्यात येईल.

**कौशल्य उपक्रम:** सागरी, जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर क्षेत्रांसाठी मनुष्यबळ तयार करण्यासाठी, उद्योग-संलग्न प्रशिक्षणास प्रोत्साहन देण्यासाठी आणि रोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ केंद्र आणि राज्य कौशल्य विकास उपक्रमांचा फायदा घेईल. सरकारी कौशल्य विकास उपक्रमांमध्ये खालील बाबींचा समावेश आहे:

- प्रधानमंत्री कौशल्य विकास योजना २.० (पीएमकेव्हीवाय) - प्रमाणपत्रासह उद्योगाशी संबंधित कौशल्य प्रशिक्षण प्रदान करते
- प्रधानमंत्री कौशल केंद्र (पीएमकेके) - भारतभर मॉडेल कौशल्य प्रशिक्षण केंद्रे स्थापन करणे
- इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ स्किल्स (आयआयएस) - आघाडीच्या उद्योंगांशी भागिदारी करुन जागतिक दर्जाचे कौशल्य प्रशिक्षण देते.

- प्रगत व्यावसायिक प्रशिक्षण योजना (एव्हीटीएस) - विशेष तांत्रिक क्षेत्रातील कामगारांचे कौशल्य वाढविणे
- अप्रेंटिस ॲक्ट, १९६१ अंतर्गत अप्रेंटिसशिप प्रशिक्षण - तरुणांना ऑन-द-जॉब प्रशिक्षण आणि रोजगारास प्रोत्साहित करते
- चाणक्य योजना - उदयोन्मुख तंत्रज्ञान आणि मोक्याच्या (strategic) क्षेत्रात कुशल मनुष्यबळ विकसित करणे
- दीनदयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना (डीडीयू-जीकेवाय) - ग्रामीण युवकांना कौशल्य प्रदान करणे आणि रोजगार प्रदान करणे हे उद्दीष्ट आहे

# १२. संशोधन व विकासाला चालना

जहाजबांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापराशी संबंधित संशोधनाला चालना देण्यासाठी संशोधन आणि विकास केंद्रे आणि उष्मायन केंद्रे (incubation centers) स्थापन करण्यास महाराष्ट्र सागरी मंडळ पाठिंबा देईल. यामध्ये चाचणी सुविधा, उत्कृष्टता केंद्र इत्यादींच्या स्थापनेसाठी पाठिंबा देणे देखील समाविष्ट असेल. जहाजबांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा विकासक किंवा खाजगी इच्छुक घटक यांना नामांकित राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय संस्थांबरोबर सहकार्यात्मक संशोधनास महाराष्ट्र सागरी मंडळ प्रोत्साहन देईल.

# १३. सर्वसाधारण अटी

सर्व प्रवर्गातील जहाजबांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा निर्माण करण्यासाठी विकासकांना प्रस्तुतच्या धोरणातील खालील “सर्वसाधारण अटी” लागू आणि बंधनकारक राहतील:-

१. सवलत / भाडेपट्टा कालावधी

- जहाजबांधणी किंवा जहाज दुरुस्ती किंवा जहाज पुनर्वापर सुविधा यासाठी सवलत/ भाडेपट्टा कालावधी ३० वर्षांचा असेल आणि तो पुढे २० वर्षांपर्यंत वाढविला जाऊ शकतो.
- सध्याच्या किंवा नव्याने येणा-या आगामी बंदरांमध्ये विकसित केल्या जाणाऱ्या जहाजबांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा यासाठीचा सवलत/ भाडेपट्टा कालावधी हा त्या बंदरासाठी स्वाक्षांकित केलेल्या सवलत करारनाम्याच्या कालावधीशी सुसंगत राहील.

## २. मुदतवाढीसाठीचे धोरण

- खाजगी विकासक किंवा ऑपरेटर सवलत कालावधी किंवा भाडेपट्टयाचा कालावधी, यापैकी जो असेल तो, संपुष्टात यायच्या किमान एक वर्ष आधी मुदतवाढीसाठी मागणी करेल. अशी मुदतवाढ विकासकाने डीपीआर मध्ये नमूद केल्याप्रमाणे १००% गुंतवणूक करणे, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅन यांची पूर्तता करण्याच्या अधीन असेल. ही मुदतवाढ राज्य शासनाच्या मान्यतेच्या अधीन असेल.

- प्रकल्प विकासक किंवा ऑपरेटर हे त्यांच्या डीपीआर मध्ये नमूद केल्याप्रमाणे गुंतवणूक, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅन यासंदर्भातील प्रकल्पाच्या प्रगतीबाबत महाराष्ट्र सागरी मंडळाला तिमाही अहवाल सादर करेल. महाराष्ट्र सागरी मंडळ दरवर्षी प्रत्येक प्रकल्पाचा आढावा घेईल जेणेकरून असा प्रकल्प त्याच्या डीपीआरचे पालन करीत आहे किंवा कसे, हे तपासले जाईल.

- कोणत्याही अनुज्ञेय मुदतवाढीसह सवलतीचा कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी संपुष्टात आल्यानंतर, प्रकल्प महाराष्ट्र सागरी मंडळ / राज्य सरकारकडे हस्तांतरित केला जाईल. महाराष्ट्र सागरी मंडळ/ राज्य शासन असा प्रकल्प चालवतील आणि/ किंवा त्याच्या कार्यचालन व देखभालीसाठी पारदर्शक आणि स्पर्धात्मक निविदा पध्दतीने ऑपरेटरची निवड करतील.

## ३. पर्यावरण आणि सुरक्षा नियम

जहाजबांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा यांना सर्व संबंधित पर्यावरणीय आणि सुरक्षा नियमांचे पालन करणे आवश्यक राहील.

एमएमबी खालील शाश्वत क्रियाकलापांच्या विकासास प्रोत्साहन आणि समर्थन देईल:

- स्वच्छ ऊर्जा: शिपयार्डच्या संचालनासाठी स्वच्छ ऊर्जा स्त्रोतांचा अवलंब.
- पर्यावरण-अनुकूल कार्यचालन: राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय नियमांचे पालन करून शाश्वत जहाज बांधणी आणि जहाज दुरुस्ती क्रियाकलाप आणि पर्यावरण-जागरूक जहाज पुनर्वापरास प्रोत्साहन देणे.

## ४. इतर नियम

जहाज बांधणी, जहाज दुरुस्ती आणि जहाज पुनर्वापर सुविधा यांना इतर सर्व संबंधित नियमांचे पालन करणे आवश्यक राहील.

## ५. विस्तार प्रकल्प

विद्यमान जहाज बांधणी किंवा जहाज दुरुस्ती किंवा जहाज पुनर्वापर सुविधा प्रकल्प हे त्यांच्या विस्तारासाठी, नवीन प्रकल्पांसाठी लागू असलेल्या प्रोत्साहनाच्या ८०% पर्यंत प्रोत्साहन मिळण्यास पात्र असतील.

# परिशिष्ट १- सागरी शिपयार्ड समूहासाठी (MSC) निश्चित केलेली ठिकाणे

| प्रस्तावित MSC स्थान | खाडी / नदी | भराव करावयाची ITZ जमीन (एकर) | संपादित करण्यात येणारी जमीन (एकर) | एकूण विकासयोग्य जमीन (एकर) | वॉटरफ्रंट (मी) | भरतीच्या श्रेणीसह उपलब्ध खोली | ड्रेजिंगसह प्रस्तावित खोली |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **दिघी** | राजपुरी खाडी | १८०० | ७५० | २५५० | ३००० | ९ मी | १४ मी. |
| **जयगड** | जयगड खाडी | ६६० | ६७७ | १३३७ | १६०० | ९ मी | १४ मी. |
| **दाभोळ** | वाशिष्ठी नदी | १३१ | ८०० | ९३१ | १००० | ८.५ मी. | १४ मी. |
| **नांदगाव** | खुला समुद्र | २२५ | २४४४ | २६६९ | १००० | ६.० मीटर (किनाऱ्यापासून १.० किमी अंतरावर) | १४ मी. |
| **विजयदुर्ग** | खुला समुद्र | ३५९ | १०१२ | १३७१ | १००० | ८.५ मी. (किनाऱ्यापासून ०.५ कि.मी. अंतरावर) | १४ मी. |
| **बाणकोट** | सावित्री नदी | ३७० | ४८६ | ८५६ | ५०० | ११ मी. | १४ मी. |

# 1. Dighi Marine Shipyard Cluster







| | | |
|---|---|---|
| **Location** | Agardanda and Dighi village, Rajapuri creek, Murud Janjira taluka, Raigad district | |
| **Depth** | Minimum available depth: ~5m<br>Tidal variation: ~4m<br>With additional dredging of 6m, 14m depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: ~13m with tidal variation<br>With additional dredging of 1m, 14m depth can be achieved in the channel | |
| **Waterfront** | ~3.0 km | |
| **Dry Docks** | At least 4 dry docks can be planned within the proposed site | |
| **Land** | ITZ Land to be reclaimed | ~1800 acres |
| | Other Land to be acquired | ~750 acres |
| | Total Developable Land | ~2550 acres |
| **Connectivity** | Highway | NH548A (approximately 0.5km) |
| | Railway station | Roha railway station (approximately 35 km) |
| | Airport | Mumbai Airport: approximately 153 km<br>Upcoming Navi Mumbai Airport: 122 km |
| **Other Features** | Located within vicinity of 1 operational Shipyard (184 acres)<br>Proximity to Dighi Port Industrial Area (DPIA) | |

# 2.Jaigad Marine Shipyard Cluster







| | | |
|---|---|---|
| **Location** | Satkondi village, Jaigad river, Ratnagiri district | |
| **Depth** | Minimum available depth: ~6m<br>Tidal variation: ~3m<br>With additional dredging of 6m, 14m depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: ~9m with tidal variation<br>With additional dredging of 5m, 14m depth can be achieved in the channel | |
| **Waterfront** | ~1.6 km | |
| **Dry Docks** | At least 2 dry docks can be planned within the proposed site | |
| **Land** | ITZ Land to be reclaimed | ~660 acres |
| | Other Land to be acquired | ~677 acres |
| | Total Developable Land | ~1337 acres |
| **Connectivity** | Highway | SH4 (approximately 6.0 km) |
| | Railway station | Aravali road railway station (approximately 70 km) |
| | Airport | Kolhapur (KLH) Airport: 134 km |
| **Other Features** | Site is located in the vicinity of 1 operational Shipyard (220 acres) | |

# 3. Dabhol Marine Shipyard Cluster







| | | |
|---|---|---|
| **Location** | Dhopave village, Vashishti river, Dapoli taluka, Ratnagiri district | |
| **Depth** | Minimum available depth: ~6m<br>Tidal variation: ~3m<br>With additional dredging of 6m, 14m depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: ~9m with tidal variation<br>With additional dredging of 5m, 14m depth can be achieved in the channel | |
| **Waterfront** | ~1.0 km | |
| **Dry Docks** | At least 1 dry dock can be planned within the proposed site | |
| **Land** | ITZ Land to be reclaimed | ~131 acres |
| | Other Land to be acquired | ~800 acres |
| | Total Developable Land | ~931 acres |
| **Connectivity** | Highway | SH4 (approximately 3.0 km) |
| | Railway station | Veldur railway station (approximately 60 km) |
| | Airport | Pune Airport: 130 km |
| **Other Features** | Site is located in the vicinity of 1 operational Shipyard in (182 acres) | |

# 4. Nandgaon Marine Shipyard Cluster







| | | |
|---|---|---|
| **Location** | Alewadi village, Palghar district | |
| **Depth** | Minimum available depth: 1.0m (at a distance of 1.0 km from the coast)<br>Tidal variation: ~5m<br>With additional dredging of 8m, 14m depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: Facing open sea<br>With additional dredging of 8m, 14m depth can be achieved | |
| **Waterfront** | ~1.0 km | |
| **Dry Docks** | At least 2 dry docks can be planned within the proposed site | |
| **Land** | ITZ Land to be reclaimed | ~225 acres |
| | Other Land to be acquired | ~2444 acres |
| | Total Developable Land | ~2669 acres |
| **Connectivity** | Highway | SH32 (approximately 8.0 km) |
| | Railway station | Palghar railway station (approximately 20 km) |
| | Airport | Mumbai Airport: 90 km |
| **Other Features** | Site is located in the vicinity of 1 upcoming Major Port (3580 acres) | |

# 5. Vijaydurg Marine Shipyard Cluster







| | | |
|---|---|---|
| **Location** | Girye village, Devgad taluka, Sindhudurg district | |
| **Depth** | Minimum available depth: ~3m<br>Tidal variation: ~2.5m<br>With additional dredging of 8.5m, 14m depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: Facing open sea<br>With additional dredging of 11m, 14m depth can be achieved | |
| **Waterfront** | ~1.0 km | |
| **Dry Docks** | At least 3 dry docks can be planned within the proposed site | |
| **Land** | ITZ Land to be reclaimed | ~359 acres |
| | Other Land to be acquired | ~1012 acres |
| | Total Developable Land | ~1371 acres |
| **Connectivity** | Highway | SH115 (approximately 2.0km) |
| | Railway station | Rajapur road railway station (approximately 55 km) |
| | Airport | Goa Dabolim International Airport, Goa: 207 km |
| **Other Features** | Close to Jaigad port, which is 55 km from the proposed location | |

## 6. Bankot Marine Shipyard Cluster







| | | |
|---|---|---|
| **Location** | Bankot village, Savitri river, Mandangad taluka, Ratnagiri district | |
| **Depth** | Minimum available depth: **~6m**<br>Tidal variation: **~5m**<br>With additional dredging of **3m, 14m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~11m**<br>With additional dredging of **3m, 14m** depth can be achieved | |
| **Waterfront** | **~0.5 km** | |
| **Dry Docks** | At least **2 dry docks** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~486 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~370 acres** |
| | **Total Developable Land** | **~856 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH100** (approximately 2.0 km) |
| | **Railway station** | **Mangaon railway station** (approximately 45 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** 180 km |
| **Other Features** | Mahad MIDC is within 70 km | |

## परिशिष्ट २-- एकल (Standalone) शिपयार्ड साठी निश्चित केलेली ठिकाणे:

| प्रस्तावित जागा | खाडी / नदी | भराव करावयाची ITZ जमीन (एकर) | संपादित करण्यात येणारी जमीन (एकर) | एकूण विकासयोग्य जमीन (एकर) | वॉटरफ्रंट (मी) | भरतीच्या श्रेणीसह उपलब्ध खोली |
|---|---|---|---|---|---|---|
| वैतरणा येथे रेल्वे पुलाच्या पूर्व व पश्चिमेला | वैतरणा नदी | ४२ | १८ | ६० | २५० | ६ मी |

| प्रस्तावित जागा | खाडी / नदी | भराव करावयाची ITZ जमीन (एकर) | संपादित करण्यात येणारी जमीन (एकर) | एकूण विकासयोग्य जमीन (एकर) | वॉटरफ्रंट (मी) | भरतीच्या श्रेणीसह उपलब्ध खोली |
|---|---|---|---|---|---|---|
| मारंबळ पाडा जेट्टी, विरारच्या पूर्व व पश्चिमेला | वैतरणा नदी | ४० | १९ | ५९ | १००० | ६ मी |
| रेती बंदर, विरार | वैतरणा नदी | ५.५ | ३०.५ | ३६ | १०० | ६ मी |
| भोनांग गाव | कुंडलिका नदी | ७७ | ८० | १५७ | २०० | ५ मी. |
| साळाव बंदराजवळील रेवदंडा | कुंडलिका नदी | ३६ | - | ३६ | ७०० | ६ मी |
| मानकुळे गाव | अंबा नदी | ३ | २५ | २८ | ३५ | ७ मी. |
| शहाबाज | अंबा नदी | १ | १२ | १३ | १८० | ६ मी |
| आडी-ठाकूर आगरदांडा | राजपुरी खाडी | २५ | ५५ | ८० | ७७० | ४.५ मी. |
| रोहिले गाव, जयगड | जयगड नदी | ६.५ | १५.५ | २२ | २०० | ८ मी |
| काताळे गाव, जयगड | जयगड नदी | ४ | - | ४ | १०० | ८ मी |
| विजयदुर्ग जेट्टी | वाघोटन नदी | ४.५ | १६.५ | २१ | ५०० | ६ मी |

# 1. Vaitarna - East and West of railway bridge







| | | |
|---|---|---|
| **Location** | Vaitarna city, Vaitarna river, Palghar district | |
| **Depth** | Minimum available depth: **~3m**<br>Tidal variation: **~3m**<br>With additional dredging of **2m**, **8m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7 m** with tidal variation<br>With additional dredging of **1m, 8m** depth can be achieved in the channel | |
| **Waterfront** | **~0.3 km** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~42 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~18 acres** |
| | **Total Developable Land** | **~60 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **NH48** (approximately 3.0 km) |
| | **Railway station** | **Vaitarna railway Station** (approximately 1.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** approximately 80 km |
| **Other Features** | Within close proximity to an upcoming Major Port and Jawaharlal Nehru Port | |

## 2. Virar- East and West of Marambal Pada Jetty







| | | |
|---|---|---|
| **Location** | Virar city, Vaitarna river, Palghar district | |
| **Depth** | Minimum available depth: **~3m**<br>Tidal variation: **~3m**<br>With additional dredging of **2m, 8m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7m** with tidal variation<br>With additional dredging of **1m, 8m** depth can be achieved in the channel | |
| **Waterfront** | **~1.0 km** | |
| **Dry Docks** | At least **1 dry docks** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~40 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~19 acres** |
| | **Total Developable Land** | **~59 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH40** (approximately 5.0 km) |
| | **Railway station** | **Virar railway station** (approximately 5.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** approximately 80 km |
| **Other Features** | Within close proximity to an upcoming Major Port and Jawaharlal Nehru Port | |

# 3. Reti Bandar, Virar







| | | |
|---|---|---|
| **Location** | Virar city, Vaitarna river, Palghar district | |
| **Depth** | Minimum available depth: **~3m**<br>Tidal variation: **~3m**<br>With additional dredging of **2m, 8m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7.0 m** with tidal variation<br>With additional dredging of **1m, 8m** depth can be achieved in the channel | |
| **Waterfront** | **~0.1 km** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~5.5 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~30.5 acres** |
| | **Total Developable Land** | **~36 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH40** (approximately 3.0 km) |
| | **Railway station** | **Virar railway station** (approximately 5.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** approximately 80 km |
| **Other Features** | Within close proximity to an upcoming Major Port and Jawaharlal Nehru Port | |

# 4. Bhonang Village







| | | |
|---|---|---|
| **Location** | Bhonang village, Kundalika river, Alibaug taluka, Raigad district | |
| **Depth** | Minimum available depth: **~2 m**<br>Tidal variation: **~3 m**<br>With additional dredging of **2m, 7m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7m** with tidal variation No additional dredging required | |
| **Waterfront** | **~0.2 km** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~77 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~80 acres** |
| | **Total Developable Land** | **~157 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH90** (approximately 2.5 km) |
| | **Railway station** | **Roha railway station** (approximately 26.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** 120 km<br>**Navi Mumbai Airport:** approximately 90 km |
| **Other Features** | Salav Port (JSW) in within close proximity | |

# 5. Revdanda near Salav Port







| | | |
|---|---|---|
| **Location** | Revdanda village, Kundalika river, Alibaug taluka, Raigad district | |
| **Depth** | Minimum available depth: **~3 m**<br>Tidal variation: **~3 m**<br>With additional dredging of **1m, 7m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7m** with tidal variation No additional dredging required | |
| **Waterfront** | **~0.7 km** | |
| **Dry Docks** | At least **2 dry docks** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~36 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~0 acres** |
| | **Total Developable Land** | **~36 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH4** (approximately 0.5 km) |
| | **Railway station** | **Roha railway station** (approximately 40.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** 120 km<br>**Navi Mumbai Airport:** approximately 90 km |
| **Other Features** | Salav Port (JSW) in within close proximity | |

# 6. Mankule village







| | | |
|---|---|---|
| **Location** | Mankule village, Amba river, Alibaug taluka, Raigad district | |
| **Depth** | Minimum available depth: **~4 m**<br>Tidal variation: **~3 m**<br>No additional dredging required | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7m** with tidal variation No additional dredging required | |
| **Waterfront** | **~35 m** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~3 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~25 acres** |
| | **Total Developable Land** | **~28 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH4** (approximately 10.0 km) |
| | **Railway station** | **Pen railway station** (approximately 25.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** 70 km<br>**Navi Mumbai Airport:** approximately 40 km |
| **Other Features** | Located within vicinity of 1 operational port (~100 acres) | |

# 7. Shahabaj village







| | | |
|---|---|---|
| **Location** | Shahabaj village, Amba river, Alibaug taluka, Raigad district | |
| **Depth** | Minimum available depth: **~3 m**<br>Tidal variation: **~3 m**<br>With additional dredging of **1m, 7m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7m** with tidal variation No additional dredging required | |
| **Waterfront** | **~180 m** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~1 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~12 acres** |
| | **Total Developable Land** | **~13 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **NH166A** (approximately 0.5 km) |
| | **Railway station** | **Kasu railway Station** (approximately 15.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** 70 km<br>**Navi Mumbai Airport:** approximately 40 km |
| **Other Features** | Located within vicinity of 1 operational port (~100 acres) | |

# 8. Adi-Thakur Agardanda







| | | |
|---|---|---|
| **Location** | Adi-Thakur village, Rajapuri creek, Mhasala taluka, Raigad district | |
| **Depth** | Minimum available depth: **~0.5 m**<br>Tidal variation: **~4 m**<br>With additional dredging of **2.5 m, 7 m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~7 m**<br>No additional dredging required | |
| **Waterfront** | **~ 770 m** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~25 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~55 acres** |
| | **Total Developable Land** | **~80 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **NH753F** (approximately 3.2 km) |
| | **Railway station** | **Roha railway station** (approximately 42.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** 160 km<br>**Navi Mumbai Airport:** approximately 122 km |
| **Other Features** | Located within vicinity of 1 operational Shipyard (184 acres)<br>Proximity to Dighi Port Industrial Area (DPIA) | |

# 9. Rohile village, Jaigad







| | | |
|---|---|---|
| **Location** | Rohile village, Jaigad river, Ratnagiri district | |
| **Depth** | Minimum available depth: **~5 m**<br>Tidal variation: **~3 m**<br>No additional dredging required | |
| **Channel Depth** | Channel depth: **~9 m**<br>No additional dredging required | |
| **Waterfront** | **~200 m** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~6.5 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~15.5 acres** |
| | **Total Developable Land** | **~22 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH4** (approximately 0.5 km) |
| | **Railway station** | **Ratnagiri railway station** (approximately 52.0 km) |
| | **Airport** | **Kolhapur (KLH) Airport:** 134 km |
| **Other Features** | Site is located in the vicinity of 1 operational Shipyard (220 acres) | |

# 10. Katale village, Jaigad







| | | |
|---|---|---|
| **Location** | Katale village, Jaigad river, Ratnagiri district | |
| **Depth** | Minimum available depth: **~5 m**<br>Tidal variation: **~3 m**<br>No additional dredging required | |
| **Channel Depth** | Channel depth: **~9 m**<br>No additional dredging required | |
| **Waterfront** | **~ 100 m** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~4.0 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~0.0 acres** |
| | **Total Developable Land** | **~4.0 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH105** (approximately 1.5 km) |
| | **Railway station** | **Ratnagiri railway station** (approximately 55.0 km) |
| | **Airport** | **Mumbai Airport:** 311 km<br>**Kolhapur (KLH) Airport:** 134 km |
| **Other Features** | Site is located in the vicinity of 1 operational Shipyard (220 acres) | |

# 11. Vijaydurg Jetty, Vijaydurg







| | | |
|---|---|---|
| **Location** | Vijaydurg village, Vagothan river, Devgad taluka, Sindhudurg district | |
| **Depth** | Minimum available depth: **~3 m**<br>Tidal variation: **~3 m**<br>With additional dredging of **1m, 7m** depth can be achieved at the site | |
| **Channel Depth** | Channel depth: **~6 m**<br>With additional dredging of **1m, 7m** depth can be achieved | |
| **Waterfront** | **~500 m** | |
| **Dry Docks** | At least **1 dry dock** can be planned within the proposed site | |
| **Land** | **ITZ Land to be reclaimed** | **~4.5 acres** |
| | **Other Land to be acquired** | **~16.5 acres** |
| | **Total Developable Land** | **~21.0 acres** |
| **Connectivity** | **Highway** | **SH4** (approximately 0.5 km) |
| | **Railway station** | **Vaibhavwadi railway station** (approximately 70.0 km) |
| | **Airport** | **Kolhapur (KLH) Airport:** 134 km |
| **Other Features** | Close to Jaigad port, which is 55 km from the proposed location | |

